**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः धोरण १०१६/प्र.क्र.९६/टेक्स १ (अ)**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ११ जानेवारी, २०१७

**प्रस्तावना :-**

राज्यात वस्त्रोद्योग व्यवसायात कापसाचे वाढलेले भाव, सूताच्या बाजारातील घसरलेल्या किंमती इत्यादीमुळे वस्त्रोद्योग व्यवसाय अडचणीत आला आहे. त्या अनुषंगाने सूतगिरण्यांच्या अडचणी सोडविण्यासंदर्भात निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच दि.१ सप्टेंबर, २०१५ रोजी झालेल्या बैठकीत मा. मंत्रिमंडळाने सहकारी सूतगिरण्यांसाठी धोरण सादर करण्याबाबतचे निर्देश दिले होते. त्यास अनुसरुन दि.९ जानेवारी, २०१७ रोजी झालेल्या मा. मंत्रिमंडळ बैठकीत मान्य करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरुन शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१) सहकारी सूतगिरण्या सुरळीत चालाव्यात तसेच आर्थिक अडचणीतून बाहेर याव्यात याकरीता राज्यातील सहकारी सूतगिरण्यांनी प्रति चाती रु.३०००/- याप्रमाणे वित्तीय संस्थेकडून / रा.स.वि.नि. कडून त्यांचे स्तरावर ५ वर्ष मुदतीसाठी कर्ज घ्यावे. सदर ५ वर्षाचे कमाल १२% पर्यंतचे व्याज शासन भरेल, परंतु ज्या सहकारी सूतगिरण्यांनी त्यांना यापूर्वी शासन आदेश दि.३ डिसेंबर, २०११ अन्वये प्राप्त झालेल्या बिनव्याजी कर्जाची परतफेड केली आहे त्याच सूतगिरण्या या योजनेसाठी पात्र राहतील. यासाठी येणाऱ्या खर्चासाठी विहित पध्दतीने स्वतंत्रपणे तरतूद करण्यात येईल.

२) शासनाकडून सहकारी सूतगिरण्यांना उपलब्ध करुन देण्यात आलेल्या शासकीय भागभांडवलावर प्राप्त होणारे व्याज शासकीय भागभांडवलात समायोजित (interest capitalization) करण्यात येऊ नये तसेच यापुर्वी समायोजित करण्यात आलेले व्याज शासकीय भागभांडवल स्वरुपात परत करण्यात यावे. यापुर्वी समायोजित केलेले व्याज ज्या लेखाशिर्षाखाली शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात आले आहे, त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येईल. म्हणजेच मागास प्रवर्गातील सूतगिरण्यांसाठी "मागणी क्रमांक - व्ही-३, ४४२५-सहकारावरील भांडवली खर्च - (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना - (००) (०७) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (विशेष घटक योजना) (४४२५ ०७०३), ३२ अंशदाने" या लेखाशिर्षातून व खुल्या प्रवर्गातील सहकारी सूतगिरण्यांसाठी "मागणी क्रमांक - व्ही-३, ४४२५-सहकारावरील भांडवली खर्च - (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना - (००) (०५) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (४४२५ ०३३८), ३२ अंशदाने" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१११११८०९२९३६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2017.01.12 15:46:23 +05'30'

**( विशाल मदने )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
६) महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
७) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक,
८) प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक,
९) कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (४ प्रतींसह),
१०) कार्यासन अधिकारी, १६-सी, १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
११) वित्त विभाग, व्यय-२ / अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-३२,
१२) नियोजन विभाग, कार्यासन-१४३१, मंत्रालय, मुंबई-३२,
१३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागपूर,
१५) प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, सोलापूर / औरंगाबाद / नागपूर /मुंबई ,
१६) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था,
१७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती),
२०) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई-१,
२१) चेअरमन, सर्व सहकारी सूतगिरण्या (मार्फत संचालक वस्त्रोद्योग, संचालनालय, नागपूर),
२२) निवडनस्ती (टेक्स १ अ / ब).